**श्री. संतोष नामदेवराव लसवंते, मु. गवंडी, पो. खर्डा, ता. बाभुळगांव, जि. यवतमाळ यांची "अनुरेखक" पदावर पुनर्नियुक्ती करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र.टिपीव्ही१५१३/प्र.क्र.१/नवि-२७,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ०३ सप्टेंबर, २०१५.

वाचा :- १. उप संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/वर्ग-३/अनुरेखक/उपसंअम/११८३, दि.११.०६.२०१२.

२. श्री. संतोष नामदेवराव लसवंते, अनुरेखक यांचा अर्ज, दि.१३.०६.२०१२.

३. श्री. संतोष नामदेवराव लसवंते, अनुरेखक यांचा अर्ज, दि.१८.१०.२०१२.

४. उप संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/संनाल/अनुरेखक/कार्यमुक्त/उपसंअम/२०१०, दि.२०.१०.२०१२.

५. सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम यांचे कार्यालयीन आदेश क्र.आस्था/कार्यमुक्त/संनाल/अनु/ससंनरवा/८१९, दि.२२.१०.२०१२.

६. अधिक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, अमरावती परिमंडळ, जलसंपदा विभाग, अमरावती यांचे कार्यालयीन आदेश क्र.७७६/ससे/पमं/अप्रावि/२०१२, दि.२०.०९.२०१२.

७. अधिक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, अमरावती परिमंडळ, जलसंपदा विभाग, अमरावती यांचे कार्यालयीन आदेश क्र.१०२५/ससे/पमं/अप्रावि/२०१२, दि.०९.११.२०१२.

८. श्री. संतोष नामदेवराव लसवंते यांचा अर्ज, दि.०२.११.२०१२.

९. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/संनाल/प्रशा-१/९९, दि.०५.०१.२०१३.

१०. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७.

**प्रस्तावना :-**

श्री. संतोष नामदेवराव लसवंते, मु. गवंडी, पो. खर्डा, ता. बाभुळगांव, जि. यवतमाळ यांची उप

संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती यांच्या **संदर्भ-१** येथील दि.११.०६.२०१२ च्या आदेशान्वये विशेष मागास प्रवर्गातील उमेदवार म्हणून सरळसेवेने "अनुरेखक" (वेतनसंरचना रु.५,२००-रु.२०,२००+ग्रेड पे रु.२,०००/- व ०७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर ग्रेड पे रु.२,४००/-) या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्ती करण्यात येऊन त्यांची पदस्थापना सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम कार्यालय येथे करण्यात आली होती. त्या कार्यालयात त्यांना दि.१३.०२.२०१२ (म.पू.) पासून रुजू करुन घेण्यात आले होते.

**०२.** दरम्यान श्री. सं. ना. लसवंते, तत्कालीन अनुरेखक यांची जलसंपदा विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अधिक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, अमरावती परिमंडळ, अमरावती यांच्यामार्फत स्पर्धात्मक परीक्षेव्दारे "स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक" पदासाठी निवड झाल्याने त्यांनी त्यांच्या **संदर्भ-३** येथील दि.१८.१०.२०१२ च्या अर्जान्वये त्यांना नविन नियुक्तीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता अनुरेखक पदाचा राजीनामा मंजूर करण्याची विनंती केली होती. उप संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती यांनी त्यांच्या **संदर्भ-४** येथील दि.२०.१०.२०१२ अन्वये श्री. सं. ना. लसवंते, तत्कालीन अनुरेखक यांचा राजीनामा स्वीकृत करुन त्यांना दि.२२.१०.२०१२ (म.नं.) रोजी कार्यमुक्त करण्याचे आदेश दिले होते. उक्त आदेशास अनुसरुन सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम यांनी त्यांच्या **संदर्भ-५** येथील दि.२२.१०.२०१२ च्या कार्यालयीन आदेशान्वये श्री. सं. ना. लसवंते, तत्कालीन अनुरेखक यांना दि.२२.१०.२०१२ (म.नं.) पासून अनुरेखक पदावरुन कार्यमुक्त केले होते.

**०३.** पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांनी श्री. सं. ना. लसवंते यांची शैक्षणिक अर्हता ही महाराष्ट्र राज्य व्यवसाय शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील ०१ वर्ष मुदतीचा "बांधकाम पर्यवेक्षक" (Construction Supervisor) हा प्रमाणपत्र अभ्यासक्रम "स्थापत्य अभियांत्रिकी सहाय्यक" पदासाठी लागू नाही, या कारणास्तव त्यांची नियुक्ती रद्द करण्याचे कळविल्याने अधिक्षक अभियंता व परिमंडळीय अधिकारी, दक्षता पथक, अमरावती यांनी त्यांच्या **संदर्भ-७** येथील दि.०९.११.२०१२ च्या आदेशान्वये श्री. सं. ना. लसवंते यांची स्थापत्य अभियांत्रिकी सहायक पदावरील नियुक्ती रद्द केलेली आहे.

**०४.** तद्नंतर, श्री. सं. ना. लसवंते यांनी त्यांच्या **संदर्भ-८** येथील दि.२०.११.२०१२ च्या अर्जान्वये त्यांना नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवर "अनुरेखक" पदावर पुनर्नियुक्ती करण्याची विनंती केलेली आहे.

**०५.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-९** येथील दि.०५.०१.२०१३ च्या पत्रान्वये प्रस्तुतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०६.** सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक, दि.०२.१२.१९९७ अन्वये शासकीय सेवेचा राजीनामा स्वीकारण्यासंबंधातील सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदरहू शासन परिपत्रकातील **परिच्छेद-३** अन्वये शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्याने शासकीय सेवेचा दिलेला राजीनामा अंमलात येण्याच्या तारखेपासून त्याचा शासकीय सेवेवरील हक्क गमावला जातो. त्यामुळे राजीनामा स्वीकृत करुन त्याला कार्यमुक्त करण्यात आल्यानंतर त्याची सेवेत पुन्हा घेण्याची विनंती मान्य करण्यात येऊ नये. तथापि, अशा अधिकाऱ्याची / कर्मचाऱ्याची सेवेत पुन्हा घेण्याची विनंती, केवळ लोकहितास्तव महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम, ४६ मधील शर्तींच्या अधिन राहून विचारात घेण्यात यावी, अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

**०७.** सबब, श्री. संतोष नामदेवराव लसवंते यांची नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील "अनुरेखक" पदावर पुनर्नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. संतोष नामदेवराव लसवंते, मु. गवंडी, पो. खर्डा, ता. बाभुळगांव, जि. यवतमाळ यांची नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवर विशेष मागास प्रवर्गातील उमेदवार म्हणून सरळसेवेने "अनुरेखक" (वेतनसंरचना रु.५,२००-रु.२०,२००+ग्रेड पे रु.२,०००/- व ०७ वर्षाच्या अर्हताकारी सेवेनंतर ग्रेड पे रु.२,४००/-) पदावर एक वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी पुनर्नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी श्री. सं. ना. लसवंते यांच्या अनुरेखक पदावरील पुनर्नियुक्तीबाबत आवश्यक ते कार्यकारी आदेश तातडीने निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

**०२.** श्री. सं. ना. लसवंते यांची पुनर्नियुक्तीनंतर सह संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती यांच्या अधिनस्त सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम या कार्यालयात रिक्त असलेल्या "अनुरेखक" पदावर पदस्थापना करण्यात यावी.

**०३.** श्री. सं. ना. लसवंते यांनी त्यांच्या प्रथम नियुक्तीनंतर अनुरेखक पदाचा राजीनामा देतांना एका महिन्याच्या नोटिशीऐवजी एक महिन्याचे वेतन शासनाकडे भरणा केले असल्यास, सदर एक महिन्याच्या वेतनाची रक्कम त्यांना पुन्हा देय नाही.

**०४.** श्री. सं. ना. लसवंते यांना त्यांच्या अनुरेखक पदावरील पुनर्नियुक्तीकरिता उप संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती यांच्या दि.११.०६.२०१२ रोजीच्या आदेशातील सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

**०५.** श्री. सं. ना. लसवंते यांच्या पुनर्नियुक्तीच्या अनुषंगाने त्यांच्या शैक्षणिक अर्हतेच्या कागदपत्रांची तसेच इतर आवश्यक कागदपत्रांची पुन:श्च खातरजमा करण्यात यावी.

०६. श्री. सं. ना. लसवंते यांनी संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच पुनर्नियुक्तीच्या कार्यालयात तातडीने हजर व्हावे. श्री. सं. ना. लसवंते हे अनुरेखक पदाची नियुक्ती ज्या दिवशी स्वीकारतील त्या दिवसांपासून त्यांचा एक वर्षाचा परिविक्षा कालावधी सुरु होईल.

०७. श्री. सं. ना. लसवंते यांची पुनर्नियुक्ती ही लोकहितास्तव असल्याने, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ च्या नियम, ४६ मधील शर्तीनुसार व सामान्य प्रशासन विभागाच्या **संदर्भ-१०** येथील दि.०२.१२.१९९७ च्या परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांनुसार तसेच सामान्य प्रशासन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.३७/२०१३/आठ, दि.१२.०२.२०१३ व वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.१७८/सेवा-७, दि.२४.०६.२०१५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार करण्यात येत आहे.

०८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०३१७३१३५२३२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नांवाने,

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam K Salimath
Date: 2015.09.04 11:31:45 +05'30'

**( एस. के. सालीमठ )**

महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

**प्रति :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई / महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, नागपूर.
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. **(३-प्रती)**
६. सह संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती.
७. सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम.
८. कार्यासन अधिकारी (सेवा-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी (कार्या-८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / वाशिम.
११. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. श्री. संतोष नामदेवराव लसवंते, मु. गवंडी, पो. खर्डा, ता. बाभुळगांव, जि. यवतमाळ.
१४. निवडनस्ती / नवि-२७.